**राज्यातील आदिवासी क्षेत्रामध्ये**
**<u>कन्यादान योजना राबविण्याबाबत</u>-**
**योजनेत सुधारणा-**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय क्र. सावियो-२००९/प्र.क्र.१०२/का.८,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.
**दिनांक : २५ नोव्हेंबर, २००९.**

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. सावियो-२००३/प्र.क्र.१७९/का.८, दिनांक ३ मार्च, २००४.
२) शासन शुध्दिपत्र, आदिवासी विकास विभाग, क्र.सावियो-२००३/प्र.क्र.१७९/का.८, दिनांक १८ फेब्रुवारी, २००९.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्यात राबविल्या जाणा-या कन्यादान योजनेबाबतच्या उपरोक्त दि.१८.२.२००९ च्या शुध्दीपत्रासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या अट क्र.५ मध्ये "**या योजनेअंतर्गत लाभ घेणा-या दाम्पत्यास अपत्य असता कामा नये** " ही अट अंतर्भूत केलेली आहे. त्यामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत:-

**नवदाम्पत्यापैकी एकजण म्हणजेच वर किंवा वधू अनुसूचित जमातीचा असणे आवश्यक आहे. तसेच वर आणि वधूचे वय विवाहाच्या दिनांकास विवाह नोंदणीच्या नियमानुसार असणे आवश्यक आहे. मात्र वधू व वराचे वय विवाहाच्या दिनांकास ३५ वर्षापेक्षा जास्त असू नये. वधू व वराचा प्रथम विवाह असणे आवश्यक आहे. तसेच विवाहापुर्वी दोन अपत्य झालेल्या दाम्पत्यास या योजनेचा लाभ मिळण्यासाठी " संबंधित जोडप्याने लग्न केले नाही परंतु ते एकत्र राहीले आहेत व त्याला समाज मान्यता आहे " असा दाखला योजनेचा लाभ घेणा-या जोडप्याने संबंधित ग्रामपंचायतीकडून घेऊन लग्नाच्या सोहळयापुर्वी संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडे सादर करावा व त्यानुसार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी पात्रता तपासून योजनेचा लाभ पात्र जोडप्यांना दयावा.**

२. शासनाच्या एकापेक्षा जास्त विभागाकडून विवाह अनुदानाचा लाभ घेतला जाऊ नये यासाठी या योजनेंतर्गत लाभ घेणा-या लाभार्थ्यांनी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग तसेच महिला व बाल विकास विभागामार्फत राबविण्यात येणा-या अन्य सामुहिक विवाह अनुदान योजनेचा लाभ घेतलेला नाही याबाबतची खातरजमा करण्याची दक्षता संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९११२५१८२४२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**( ग. गो. पंचभाई )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**
मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव, सहकार व वस्त्रोद्योग विभाग
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, महिला व बाल कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य,नाशिक.
आयुक्त, सहकार विभाग
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
संबंधित तालुका कोषागार अधिकारी.
सर्व सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग
सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग
निवड नस्ती (का.८), आदिवासी विकास विभाग

F:\2009C.R. 162 b p.lwp